# संदेशवाहिनी

जाइच्या कुंजांतरीं
स्वर्गिंची स्वरमाधुरी !
कोकिळे, मधुमंजुळे, घे तान तूं तानेवरी !

कूकुहू, कू, कूकुहू
कूकुहू, कू, कूकुहू–
जादु गानीं निर्मुनी मज पाहसी तूं भारवूं !

कीं तुतारी फुंकिसी
प्रीति-संदेशानिशीं ? –
' ये, वसंत, न पाहि अंत, तुझ्याविना राहूं कशी ? '

वेलिला मुद होतसे
प्रीतिला भर येतसे,
सी हृदीं प्रीती मुदीं उधळीतसे स्वर पुष्पसे.

कुंजकाननिं श्रीहरि
वाजवी जणुं बांसरी–
नाद हा पडसाद त्या मुरलीरवांचा अंतरीं !

चालुं दे, गे, चालुं दे,
राग रंगीं रंगु दे,
रंगुनी तव गानिं विश्वा लावुं दे, लय लावुं दे

कोकिळे, गे, कोकिळे,
गान गा तव मोकळें,
मोकळें मन रम्य गायन, बहिरुपाधि मावळे !

प्रेम ना बाह्यावरी
मोद विहरे अंतरीं–
कावळी तनु सांवळी, कलहंस परि अभ्यंतरीं !

स्नेहमय आनंद हा
शांतिदायक तापहा
उधळीत तूं विश्वांत संचर, संगिं घेइ वसंत हा !

## "...सागरीं होडी हाकारिली!"

अन् तुफान दर्या सभोंवतीं खवळला,
करुनियां गट्ट खडकांस पुढें उसळला—
कुणि राक्षस चवताळला गिळित नरबाल सैर चालला!

डिवचल्या नागिणी जैशा फोंफावती,
या अजस्र लाटा तैशा रोंरावती! —
बहु तेखभरें डंखिती कड्यांना, विखार फुंकारिती!

ती माडाची किति उंच ढाक! मोडली!
ती केतकिची धुळधाण कशी जाहली!
वादळीं पुरी गवसली, बालिका स्तब्ध कशी राहिली?

ना दाद तिला, हें काय चाललें असे;
कमरेवर पाणी, चित्त ठिकाणीं नसे!
हातांत धरित होडिसी, बिचारी कांहीं पाहत असे!

सम्भ्रान्त जाहली योजनगंधा जशी,
पाहते वाट सजणाची सजणी तशी,
मेघाकुल तारा कशी न्याहळी अधीरतेनें शशी ?

अधिकाधिक हिसळे लाट सागरावरी,
अधिकाधिक मिसळे मेघ अंबरोदरीं,
ठेपली रात्र अंधारि बिचारी मनीं होय घाबरी.

तों पहिलें आसूं हळूच खालीं गळे–
भोंवती उसळत्या भुतांस वांछित मिळे,
पाकळी जशी ओघळे, गिळाया पाचोळा सळसळे.

"...कां अजुनि न येतां, नाथ, परतुनी घरा ?
एकले आज कां गेलां तुम्हि, प्रियकरा ?
या दुर्दैवानें पुरा साधिला डाव आजला खरा !

" कीं पश्चिमामुखीं बिंबित मम मोहरा
शोधितां शोधितां भागलास तूं पुरा ?
ये परतुनि क्षणिं, प्रियकरा, सुंद ती उमटवि नच गोजिरा !

" कीं गुंगलास त्या दुष्टेच्या मोहनीं
पाहतां उसळत्या लाटेच्या आडुनी ?
ती नागकन्यका कुणी, जिवलगा नेइल तुज भुलवुनी !

" ये हंसा, माझ्या बिलग हृदीं साजणा !
ही हंसी हुरुरे, भुलूं नको, मोहना !
राक्षसिणी ! भोळ्या मना, एकल्या, देसि किती यातना !

“ कीं वेधुन गेलां देवमत्स्य पाहतां
लाटांच्या उसळीवरी धुंद नाचतां
कारंजें नभिं उसळतां, सख्या, कां गुंगुनि गेला खतां ?

“ जैं भिल्ल गुंगतो रुद्राच्या तांडवीं
उसळतां क्रोधलहरी प्रलयीं शांभवी
अन् जटाजूट कंपवी, त्यांतुनी गंगाजल उसळवी.

“ तो पाणकोंबडा पहा कसा थरथरे...
या विरहसागरीं जीव तसा हुरहुरे;
चल, थट्टा आतां पुरे; राजसा, मनमैना बघ झुरे !

“ घाबरूं नको या अंधाऱ्या रात्रिला,
ये तुच्छ गणुनि या भीषण जललहरिला,
हा जीव इथें उजळला, सख्या, ये झेलिन हृदयीं तुला !”

तों चमके बिजली, आभाळीं कडकडे;
गुंगलें हृदय भीतीनें क्षण धडधडे,
पाहतां समुद्राकडे चमकुनी काय देखिलें पुढें ?

‘ हा ! हाय...’ बने उन्मत्ता अबला क्षणीं;
‘ ही आलें, सखया !...’ घाईनें ये ध्वनी
हरपली खिन्नता क्षणीं ! शक्ति ये त्वरित तिला कोठुनी ?

अंधारभरें जरि दिशा धुंद जाहली,
प्रतिकूल वायुनें लाट अधिक उसळिली,
परि तिनें ना जुमानिली—सागरीं होडी हाकारिली !

## गायिका !

खिडकीच्या जाळींतुनी उषा हळु हालविते,
सौन्दर्याच्या उपासका कुसुमाची जाग येते !
तोंच श्रवणीं भीडला कोणा रमणीचा सूर ?
वीणेच्या ग नादावरी मधुगानीं होई चूर
तरंगाया लागे मन तरंगीं संगीताच्या,
रक्तमेघाचें कीं खंड वायुसंगीतीं पूर्वेच्या ?
संगीताच्या दिव्यरंगीं वाहूं लागे काव्यझरी
सौन्दर्याच्या ओष्ठांतुनी त्यासी पीतां ये माधुरी !

"...प्रभातींच्या रम्य कालीं रमे राजहंसी कोणी ?
" जलतरंग वाजवी रंगुनीया प्रीतिगानीं !
" वासंतिका गोड हांसे मंदिराच्या कीं बाहेरीं ?
" प्रणयाचे रंग भरी त्यांत रती गे शेजारीं !
" लतिकेच्या हास्यांतुनी परिमल दरवळे,

“ गायिकेच्या संगीताची गुंफवण त्यांत मिळे !
“ स्फटिकाचा इन्दुकान्त उधळी कीं रागरंग
“ तारकेच्या प्रीतीमधें जेव्हां विधु होई दंग ?
“ गायिकेच्या गे वदनीं उधळणी रागिण्यांची
“ हृदयांत उमटल्या प्रीतीच्या ग भावनांची !
“ उर्वशीच्या अधरांतुनी रस गळे अमृताचा ?
“ कोणाच्या ग मुखांतुनी द्रव स्रवे संगीताचा ?
“ चला पाहूं ! गाते काय कुणी स्वर्गीची देवता
“ रतिरंग संपवोनी सुररंगीं परततां ?...”

येई मंदमंद पदीं खिडकीच्या जालकाशीं,
उत्सुकलें मन किती बद्ध सौंदर्याच्या पाशीं
आणि फेंकितो कटाक्ष संगीताच्या दृक्प्रांताला
होई निराश मनांत तडक कीं परतला !

कुणी उर्वशी वा देवी, राजहंसी ना ती गाई
काळी कोकिळा ‘ भिकारी ’ मागतसे भिक्षांदेहि !

## ‘मी तुला कशी पाहिली ?’

मी तुला कशी पाहिली ?
नाचऱ्या ढगांच्या बटा,
अन् पदर गुलाबी सुटा,
रुसुनिया गोडशी संध्याबाला इथें
काय बैसली ?

बैसली शिळेच्या वरी
पदिं लाट गुदगुल्या करी
भरतिला लागला अथांग सागर पुढें
कशी निवळली ?

येउनी हळुच मागुती
वाकलों जरा खालतीं–
तों चमक विजेची गेली हृदयांतरीं
कळी उमलली !

## ‘ मी तुला कसा पाहिला ? ’

मी तुला कसा पाहिला ?
सांवळी ढगांची शिला,
मागुनी रंग उधळिला,
हसुनिया प्रभाकर संध्येचा लपुनिया
काय बैसला ?

बैसला शिलेमागुती;
परि नेत्र कुठें धावती ?
डोकावुन पाहे हळूच, खुद्कन् हंसे,
कसा निवळला ?

परि तिकडे मी ना बघें,
छे, मुळिं न करित वाउगें,
तों लबाड कोणी शिळेआड हालला
कळा उमलला !

## ‘ पाहतां चांद चवथिचा– ’

पाहतां चांद चवथिचा उगवला नभीं
उगवला नभीं
विसरलें भान केंव्हांची फाटकाआड मी उभी !

वळवुनी मान हा अधीर पाही कुणा
ग पाही कुणा
कोणास हळुच हा करी प्रणयाच्या हंसऱ्या खुणा

अन् वळलें माझें लक्ष जरा बाजुला
जरा बाजुला
तों कृष्ण ढगाच्या आड कुणि डोळा मिचकाविला !

जों मिचकावी अन् चांद बघे तिजकडे
बघे तिजकडे
तों बसे लपुन, कीं जाई कुणिकडच्या कोणीकडे ?

कुणि लपंडाव मांडला ढगाआडुनी ?

ढगाआडुनी ?

मी पुरी जाणिली तुला—तूं मम सखि सौदामिनी

मी सहज म्हणालें—" सखे, थांब पळभर,

" थांब पळभर,

" पाहतां वाट केव्हांची तिष्ठला चांद बाहिर ! "

अन् भान येउनी पाहें मार्गाकडे

ग मार्गाकडे,

तों हांसत-हांसत कोणी तिष्ठलें उभें मजपुढें !

## तुझ्याचसाठीं !

ही तुझ्याचसाठीं आलें धांवत, राया !
दे ठाव हृदीं, बघ कोमजली मम काया

कां उजाड विश्वीं असा एकला जाशी ?
ना तुजजवळी, प्रिय, अन्य धनाच्या राशी !
प्रीतिची झरी परि अखंड तव हृदयासी,
ना मोल तिचें जगता या

कीं भावसमाधी लागुन जाशी रानीं ?
चळतें न मन तुझें जगन्मोहजालांनीं,
प्रीतिचें गीत परि अजुनी गाते वाणी,
जीव झुरे मिल्लिण व्हाया !

गा स्नेहगान तें वाजिव तव हृद्-वीणा,
बघ वळुन एकदा, घालिव या मम शीणा,
दे जीवन, सखया, या तळमळत्या मीना,
मग स्वर्ग करूं राना या !

## निर्व्याज बालपणीं–

बालपणींची अल्लड वेळा
दुःखाची मग दाद कुणाला
उड्या घेत नाचती निसर्गीं, भीति कुणाची त्यांना !

अबब केवढा ढुंग वाळुचा,
अजिंक्य गड हा कोंडाण्याचा,
किल्लापाणी चला खेळुं या, पण मी होइन तान्हा !

घसरगुंडिनें खेळूं अथवा–
कसा सरकतों, ओ, हो, वा वा !
वाळु कशी झुळझुळे, लबाडीवरी पाय देतांना !

कसला हा रे वास येतसे ?
हां हां ! तो बघ केवडा असे,
आणुं आकडी, ओढुनि काढूं, डर मज कोणाची ना.

भेंडीचीं तीं जुनाट झाडें,
वरी बैसती किती गिधाडें,
कशी काढली पाकट त्यांची, दमलों जरि पळतांना

फळें तांबडीं देव्हारीचीं,
कशी लागती छान येथिंची,
खात चघळुनी, मिटक्या मारित, चोहिकडे फिरतांना

चला गड्यानों ! जाऊं तेथें,
मजेमजेनें खेळ खेळुं ते,
भूक लागतां आईजवळी येऊं परत घरांना.

## –आणि आज

परी आज मी तिथें पाहतां,
बालपणींचीं दृश्यें दिसतां,
धस्स होतसे हृदीं भयानें, विचार उठती नाना!

कणें-कणें तो डुंग होतसे,
क्षणें-क्षणें आयुष्य बनतसे,
ध्येयावर लावुनी दृष्टिला मनुज चढे कोंडाणा

पायीं परि ही सरके वाळू,
कसें मला आतां सांभाळूं!
हाय चाललों खालीं-खालीं, वरच्याची आशा ना!

मोहांच्या केतकीसुगंधीं
मोहुनिया मी पाहत संधी,
तों खालीं मृत्यूची फडा, मम भेदरवी नयनांना

भग्नाकांक्षा गिधाडरूपें
तिथें पाहतां हृदयीं कंपें,
धरनांचा हा वृक्ष वठुनिया गेला, ठाव न पानां !

मृत जीवांचे हेत राहिले,
प्रेताग्नीनें तप्त जाहले,
मसणवटींच्या खुरट्या रोपीं दिसती मम नेत्रांना.

बालपणींचा खेळाडू मी
भीषण बघतां स्मशानभूमि,
'परत न जाणें येथुन', ऐसें कटुवच भिडतें कर्णी !

## मोहिनी सृष्टि !

आज खरी जादुगिरी कोणितरी केली !
कां इतुकी सृष्टिसखी मोहुनिया गेली ?
विरल धुक्याची वरून,
ओढणि घे पांघरून,
पाहि वाट सखयाची मुग्ध मधुरकालीं !
ये हळूच प्रियकर तो
दूर ओढणी करि तों
आंत परी पांचूचा शालु नेसलेली !
शांत रम्य हृदयींची
मधुकवनें प्रीतीचीं
हृत्सरिता गात निर्मि भावतरंगाली !
रविकिरणें रागयुक्त
प्रियकटाक्ष प्रेमरक्त !
सांठवीत खोल हृदीं लज्जित कां झाली ?

नवपल्लव खुलवी दंव
बिंदुभूत अधरासव ?
चमकत, जें सांपडतें रविकटाक्षजालीं !
काय अशी प्रियघटना
घडली मज उमगेना !
कीं रंगे फुलरंगी रक्तिमा कपोलीं !
प्रीती रमणीजीवन
प्रियकर तत्सुखनिधान
म्हणुन काय प्रिय येतां मोहिनी उदेली ?

## जेव्हां वरी मी पाहिलें !

जेव्हां वरी मी पाहिलें—
उंच नभाच्या अंतरीं,
ढगविमानाच्या वरी
पिचकाऱ्या कोणी मारी !

हळू घातला फुंकर,
उडे विमान भुरभुर
कोण करी गे विहार ?
मन माझें वेडावलें !

कळ जादूची दाबिली,
शिडी उंच उभारली
सातरंगी अंतरालीं !

वरी ठेविले चरण,
मोतियांची पखरण;
तिच्या स्वागतालागुन
देव पायाशीं लागले,
जेव्हां वरी मी पाहिलें !

# जेव्हां खालीं निरखिलें !

जेव्हां खालीं निरखिलें !
क्षुब्ध जाहल्या सागरीं,
देवमाशाच्या गे वरी
नावक्रीडा कोण करी ?
हात पाण्यामधें धरी,
निर्मि नाचऱ्या लहरी,
चूळ फेंकी माझ्यावरी
ऊर धडाडूं लागलें !
नाव गरागरा फिरे,
निर्मि भोंवती भोंवरे
फेंकी कारंज्यांचे झरे.
काय चमत्कार केला,
जळीं खांब उभविला,
वरी नाच आरंभिला
जळीं मृदंग वाजले !
जेव्हां खालीं निरखिलें !

## आणि आंत जैं देखिलें !

आणि आंत जैं देखिलें !
उंच कल्पनागगनीं,
प्रतिभेच्या कीं विमानीं,
विहरते प्रिया राणी !
काव्यधनु भावरंगी,
रची उतरायालागीं;
वरी पद ठेवी वेगीं
मम हृदय कंपलें !
क्षुब्ध यौवनसागरीं,
युवहृदें क्रीडा करी,
उंच आशांना उभारी.
उभारुनी वरी चढे,
नाचनाचुनी बागडे,
कशी बघे माझ्याकडे !
तिज आसन कल्पिलें
हृदीं प्रीतीच्चिया मोलें,
जेव्हां आंत मी देखिलें !

## भारताच्या अनभिषिक्त सम्राटास—

विश्वाला उज्ज्वलित कराया तळपे रविमूर्ति,
जशी कीं उदयगिरींवरती,
कीं कैलासीं जागृत होई वीर जगन्नाथ
समाधी सुटतां कल्पान्त!
आल्प्सपर्वतीं सम्राट उभा कीं नेपोलीयन्,
शासण्या यूरपचें जीवन्
रायगडीं वा उभा हिंदवी-स्वराज्यनिर्माता
न्यायधर्माचा उद्धर्ता!

चार दिशांना खडे चार सम्राट जगज्जेते
मधें तव मूर्ती ही स्फुरते,
चैतन्याचा चौरस संगम तुजमध्यें झाला,
दुजी नच उपमा द्यायाला!
—किरण रवीचे, तेज शिवाचें, वीर्य फिरंगाणी

आणि ती तेजाळ भवानी !
एकावट होउनी घडविली तव तेजोमूर्ती–
" बाल " म्हणुनी ख्याता जगतीं !

*   *   *

भारतिच्या सिंहद्वाराला रक्षण्यास ठाके,
तेज दशदिशांतरीं फांके !
न्याहळितां तें विषाद वाटे मनीं निसर्गाला
अनुकृति करण्या फुरफुरला !
शिरोभूषणा किरणजाल, वदना रवि आरक्त,
उपरण्या मेघ वातमुक्त,
सुधीर हृदया सागर वरितो–झालें अनुकरण,
परि क्षणजीवि चिरंतन न !

मेघ दुन्दुभी वाजवील, ओवाळिल तेजाळा !
निरांजन तुज विद्युद्बाळा !
खोल हृदींची प्रेमळ वर्षा वर्षिल आकाश,
तिथें मज कैसा अवकाश ?
वानुं किती मी सम्राटा, तव यश:प्रभावलया
बाल तिलका ! सगुणराया !
सिंहासन तुज अर्पण केलें प्रेमें भारतिनें,
चिरंतन विराज डौलानें !

## पाठलाग

गेलें वनीं झरीच्या ग मुखीं मोत्याचे सर गुंफाया,
आला खरोखरीचा ग मुखीं मोत्याचे सर चुंफाया !
लपें क्षणीं कुंजाच्या ग आड गुलाबफुल हुंगाया,
आला क्षणीं कुंजाच्या ग आड गुलाबफुल चुंबाया !
खेळे आंबेवनीं पद, राशी रसाळ फळ वेंचाया,
खेळे आंबेवनीं पदराशीं, रसालफल वेंचाया !
गेलें सरोवरीं कमलाची वदनकळी फुलवाया,
आला सरोवरीं वदनाची कमलकळी फुलवाया !
उभी होतें, सखी रातराणी म्हणुन, गोड बोलाया,
तो ग आला, 'सखी, रातराणी !' म्हणुन गोड बोलाया !
आणि जेव्हां वनलतेपाशीं गेलें ग कुरवाळाया
कसा भिडे तनुलते, पाशीं हृदय कुरवाळाया !
किति धरूं धीरा ! अंग नसे स्वाधिन माझ्या राहियलें
आधारुनी उरा मग वसें, स्वाधिन त्याच्या मी ग झालें

## “ माझ्या राजाला नांवं कुणी ठेवूंऽऽनका !

ठेवूं नकाऽऽ कुणि ठेवूं नकाऽऽ
माझ्या राजाला नांवं कुणि ठेवूं नका !

बाळ गेला बनामधें वासुरांना चाराया,
राजा गेला रानामधें पाखुरांशीं बोलाया,
तान्हा गेला डोहामधें खूपखूप डुंबाया,
शहरींच्या बायांनो बोलूं नका,
माझ्या चिमण्याचें नांव कुणि घेऊं नका

तो ग गेला ताऱ्यांसंगें रुमूंझुमूं नाचाया,
तो ग गेला चांदोबाला हातांमधें धराया,
गेला बाई ! गगनींच्या गंगेमधें पोहाया,
खालच्या ग पोरींनों हसूं नका,
माझ्या हंसाच्या खेळा कुणि हसूं नका !

खरं, बाई! दमलं ग पोर फार खेळुनी,
मोतियाचा चारा त्याला प्रेमें खाऊं घालिन् मी,
हृदयासी धरीन् त्याला मी ग कवटाळूनी,
चला ग, साऱ्या; तुम्हि बघूं नका,
माझ्या सोन्याला दृष्ट लागे बघूं नका!

कुठें पण गेलं बाळ? अग बाई दिसेना,
येथें नाहीं? अरे देवा, गेलं कुठं सांगा ना!
सांगा, बाई, कोणीतरी, कांहींतरी बोला ना!
बाळाच्या वर राग करूं नका,
माझ्या राजाचा ठाव कुणि सांगाल का?

कुठें आहे? तळ्यावरी? धांवा कुणी शोधाया!
काय आहे आंब्यावरी? चढा बाई धराया!
काय? कुठें? देवाघरीं? अयायी ग माझीया
सोडा, बाई, जातें मी, धरूं नका,
माझ्या बाळाच्या घरिं जातें धरूं नका!

# प्रार्थना !

सुखवावी दीन दासी चरणासी ठेवुनी !
पुरवावी आस नाथा ! कनवाळू होउनी !

मुक्तांच्या सागराला भुल न पडे शुक्तिची,
लतिकेशा केमराला ना प्रीती वेलिची,
चपलेच्या वल्लभाला धारांची ना रुची !
जीवन हो सुने त्यांना परि प्रीतीवांचुनी

भानूच्या चंडतापीं तप तपते मेदिनी,
स्वपतीच्या उग्रशापीं बनलि शिळा कामिनी
प्रीतीच्या पूर्तिसाठीं वनवासी गर्भिणी
गहन जरी प्रीतीसेवा, तरि करणें मोदुनी

स्नेहाच्या सिंचनानें न्हाणिन त्वत्पादुका,
शिरकमला वाहुनीया रक्तटिळा लावुं का !
प्राणांची दीपज्योती जाळिन मी दीपका
मिरविन त्या मत्तनूच्या पायघड्या घालुनी !

## नर्तिकेस !

मंजु मंजु घुमवी, मुग्धे ! चरणिं नूपुराला !
नाच नाच, नाचुनि पसरी मधुर मोहिनीला

नाद-ताल-पद-संवादीं शैलि अप्सरेची;
रम्य मुरड ग्रीवाभंगीं मत्त बर्हिणाची,
अंगमध्यवलनीं उमटे रीत नागिणीची
भावगम्य शुचिता भुलवी साच भिल्लिणीला.

विश्वमोहि झंकृति गुंजे कुंजिं राधिकेची,
भक्तिरसोत्कर्षी गुंगे स्फूर्ति माधवाची,
निर्विकार आनंदाची वर्षणा प्रियेची,
साधु ! साधु ! आत्मस्पर्शी तुझी नृत्यलीला !

गोड घेइ गिरकी वसुधा स्वतांच्यासभोंतीं,
झणत्कार किंकिणतारा करित ताल देती,

परी कुणा भानूभंवतीं फिरे नर्तिका ती ?
फिरवि वा निराश सभोंतीं कुणा शशाङ्काला ?

कलेश्वरी ! पडणें नाहीं भूल योगियाला !
पडुनि गाधिजाला नाहीं योग्य, अस्थिराला !
येथ उभा तिष्ठत आहे प्रीतिचा भुकेला
अंगीकार, उर्वशि ! रसिके ! देख विक्रमाला !

## अनुनय!

हंससी कां गोड अशी मोहिनी ?
अवनत हो मुख विलोल, मिटलें कां नयनकमल ?
प्रणयींचा कोप कुठें ? भामिनी !

विकसे कशी रदनावली जी रुष्ट हो अधरावरी ?
भ्रू टाकुनी व्रत धानुषी लालित्य लतिकेचें वरी !
फुगिरी गालींची विरे मानिनी ! अन् तेथें गोड खळी
उमटे कां हासिनी ?

जड जाहली मति आमुची अभिजातवाङ्मयवाचनीं,
ना आकळे मज पल्लवी तव गूढ, जादूगारिणी !
कांहीं अद्‌भूत वसे कीं मनीं ? रम्य कल्पना करुनी
जाई वेडावुनी !

ही गाढशी, अभिसारिके ! बिलगे नभा रजनी अतां !
जी रुष्ट होउनि बैसली गिरिकंदरीं अवगुंठिता
फुलली निशिगंध कळी साजणी ! चल ये, ना धीर मनीं,
रत हो परिरंभणीं !

## उत्सुका !

चल जाउं झडकरी कुंजवना,
बघ उत्सुक झालें मी रमणा !

कलिंदकन्या डुलवि तरंगा,
करि उद्दीपन, फुलवि अनंगा,
प्रणय-कालिया करितो दंगा
झणिं टाक उडी, करि विमर्दना !

मधुर बांसरी वाजवि वदनीं,
नाचनाचुनी घुमविन अवनी,
अन् गेलें जर अतिशय थकुनी
तरि विसांवेन हृदयीं, सजणा !

नादब्रह्मीं लावुनी लया,
जगती अवघी फिरे, अवलिया
कुणी असे का नियंता तया ?
हे वेणुवादका, तुझ्याविना ?

## " घट बुडे बुडबुडा येइ वरी—"

घट बुडे बुडबुडा येइ वरी,
बावरे कोण ही नवकुंवरी !

तुफान भरली अथांग जमुना,
नवीन येई ही जलभरना,
बिचके हरिणी लक्ष राहिना,
लव विसरे भाना, धून पुरी !

बरसातीचें पहिलें पाणी,
फिरे भोंवरा भिरभिरवाणी,
नीरभरन करिते कुंवराणी,
तइं सुटे हातिंची कीं गगरी !

निर्मळशा जीवना न्यावया,
आली बाला कुंभ भराया,

गधूळ परि तें करि भिंगोऱ्या
हरुनिया घेत अन् कुंभ वरी !

बावरली ? तर मुग्ध कशी ही ?
पिछाडली ? पण स्तब्ध असे ही !
क्षण हांसे, क्षण लज्जित होई !
अशि काय विलक्षण जादुगिरी ?

## सोमयाग !

चेतवा वह्नि तो वेदिवरी,
ही यागसिद्धता करा पुरी !

मीलन झालें दोन जिवांचें,
ऋण-धन-विद्युद्वह बिंदूंचें,
भय आतां नच पविपाताचें,
कुर्घोडि करूं आपदांवरी

आत्मसुखाची करूं उधळणी,
आकांक्षांचे हवि देउनी,
सर्वस्वाची होळी करुनी
चढुं आनंदाच्या मेरुशिरीं

ज्योतिर्मय प्रज्वाळुन प्रीती,
धुंडुन काढूं सोमवल्लि ती !
प्यालेभर झोंकूं रसवन्ती,
मग धुंद फिरूं ब्रह्माण्डभरी

# प्रबोधन

हिमदर्पणकांच बिलोरि बरी,
गिरिमाळ खुले चौकोटिपरी,
हिमराज गिरीश्वर शीर्षिं धरी!
रंचि बाल उषा, बघ निज भूषा,
करि थाट कशास अनेक नवे?
चल झाड निशा, झणिं जाग कसा,
बघ उज्ज्वल भाग्य नभीं उगवे?

विचरे मृदु मंद मरुल्लहरी,
वरि शांति समुद्र, जरी लहरी!
नव तेज तरे विहरे उदरीं,
प्रतिबिंब पडे, चण्डोल उडे,
जें स्वागतगीत मुखीं घुमवी!
चल झाड निशा, झणिं जाग कसा,
गगनीं उगवे बघ भाग्यरवि!

बघ विन्ध्यवनीं मधु-माधविका
रचि वृंद-सुरावट नव रसिका,
शुक-कोकिल-सारिक-सारसिका
तइं स्फाटिक भूवरि नृत्य करी,
ललिता-परि कां ?-नव रेवनदी ?
चल झाड निशा, झणिं जाग कसा,
येइ भाग्य विभाकर पूर्वपदीं !

## “ शब्दसृष्टीच्या ईश्वरांस ! ”

वाजवा पंचमीं वेणु अतां !
व्हा धुंद नादवारुणी पितां !

सप्तलोक जिंकूं सप्तसुरीं,
सुधेहुनी मधु सिंचुं माधुरी,
‘ नादगुणी ’ पद अपुलें अंबरिं
श्रीरंगरूप व्हा तर आतां !

कारंजें सौन्दर्यी झरवा,
प्रणयीं रम्य फुलोरा फुलवा,
रचा नवरसीं सृष्टि अभिनवा !
ही ‘ शब्दसृष्टिची ईश्वरता ’ !

मृदुल ‘ भावना ’-लहरि हलूं द्या,
रम्य ‘ कल्पना ’-हंस डुलूं द्या !
वरी ‘ शारदा ’ चिंतनिं रमुं द्या
का आनंदा मग कमतरता ?

## भास्कर-संस्तव !

चिर जीव, भास्करा ! तळप, नभीं !
ग्रहमाळ संस्तवा तुझ्या उभी !

मुग्ध शशिकला येई नटुनी,
तेजतुषारीं तुझ्या न्हाउनी,
शिगोशीग घट घेई भरुनी
मग कसे रिकामे ? उगाच भी !

अनंत आकाशभरीं संचर,
दिगंत विश्वा उत्साहें भर,
वाहव, सवितर् ! वरेण्यनिर्झर
लाजीव कामधेनू सुरभी !

क्वचित् गरुड कुणि घेइ भरारी !
कविवर प्रणयी तान लकेरी !
तूंच परी सम्राट अंबरीं,
तव संध्योषा याच दुंदुभी !

# खळें चन्द्राच्या भोंवतीं

चन्द्राच्या कीं सभोंवतीं होतें अद्‌भुत वलय,
जेव्हां भेटायासी मला आली होउनी निर्भय;
आली होउनी निर्भय आणि भीडली हृदयीं,
मम कंठ तें वेढिला तिच्या नाजूक वलयीं.

भारवून मज करीं, पाही गोडशी वरती
रविवर्म्याच्या कीं चित्रीं राधा-माधवाची रति !
पाही जराशी वरती आणि थरारे शरीरीं
'राजा माझ्या'–हळू बोले; मग बिलगते उरीं.

'आतां पावसाची झोड, भेट होणें ना परत !'
आणि वलयाच्याकडे होती अंगुली दावीत !
किती गाढ मिठाळली, झाली अधीर चुंबना,
श्वास रोधी आयासानें, आणि रोधी आसवांना !

मग सोडवी करांस, होई दूर हळूवार,
झाली विरल पटलीं चंद्रिकेच्या कीं धूसर !
होई राजाचा भणंग, अदृष्टाची झडे सर,
होतें वलय अद्‌भुत चन्द्राच्या कीं सभोंवार !

# " बोलो विट्ठल विठ्ठल ! "

आंगणांत चाफ्यावरी नाहीं हालतें पानही,
नाही टिपूस जलाचें शेजारच्या ओढ्यांतही,
जन कामामधें दंग, नाहीं वेळ बोलायासी,
परतलों पराभूत जधीं हताश घरासी !

किती डौलानें निघालों, बाळगल्या आशा किती !
किती मनोरे मनांत उंच उंच उभारती !
परी आज परतलों, परतलों पराभूत,
सर्व उदास भासलें मज घरांत-दारांत !

जसें, घायाळ पांखरूं परतून घरीं येत
त्यास कुणीही ना पुशी, घेत नाहीं कळपांत,
तयापरी वैतागलों, फिरणार जाया, तोंची
" बोलो विठ्ठल-विठ्ठल " हांक आली पोपटाची

हांक आली पोपटाची, गेलों जवळी त्याचिया
किती वाटे आपूलकी मज साध्याशा बोलीं या !

गेलों जवळीं प्रेमानें, पाहतों तों तोच जूना
" विठू", मोडक्या चोंचीनें बोले बोबड्या बोलांना!

सानपणीं रागावुनी मागें मारीयली काठी,
बसली ती पांखराच्या नाजूकशा चंचूपुटीं
तरी तेव्हांही बोलला, आणि आतांही बोलतो
" बोलो विठ्ठल विठ्ठल"–आणि मीच परततों!

प्रेमभरानें पाहतां, कसा नाचाया लागला
जरी बाह्य जगीं सारा मोदभाव करपला
पांखरानें मानवासी शिकवावें मनोबल!
पिंगा घालतां जैं बोले: " बोलो विठ्ठल-विठ्ठल."

## मनमोहिनीस-!

आलीस तूं चपलेपरी, जातेस तूं लहरीवरी;
येतेस तूं, जातेस तूं; मम वंचना करिसी पुरी !
आजीं परी सुटका नसे, ही गाढ तुज मी वेढिली-
पुरुषी धिटाई ही नसे, प्रीती असे वेड्यापरी !

हंससी, सखे, कुसुमांतुनी, लससी, प्रिये! लतिकांतुनी;
क्षण हास्य नी क्षण लास्य ही तव मोहिनी क्षणजीविनी;
म्हणुनी अतां सुटका नसे; तूं हांस नाच चिरंतन;
परदास्य हें नच, प्रेमले! जन हा तुझा, तूं स्वामिनी!

गंभीरता तव सागरीं, तव भव्यता विमलाम्बरीं;
गंभीर तूं, अन् भव्य तूं; मम अंत तूं बघसी तरी ?
छे, आज ना सुटका तुझी, हो तूं प्रसन्न दयावति !
शरणागता दे आश्रया, बन देवता हृन्मंदिरीं !

वासंतिका भुलवीत ना, शरदीं विधू न गमे मना !
जरि हो सहारा जीवनीं, अवसेविना दिन ना सुना !

वासंतिका तूं जीवनीं, तूं जीवनीं मम पूर्णिमा !
फुलवी, सखे ! सजवी, सखे ! तव त्याविना सुटकाच ना !

आयुष्य योगायोगसें; संधी न येते सांगुनी !
कर जीवनीं संयोग, चल हो स्नेहले, सहचारिणी !

येती किती, जाती किती, किति संधि निष्फळ व्हायच्या ?
ना आज सुटका रोषिणी, गे, मानिनी ! हो स्वामिनी !

# धर्मशाळेंतील वाटसरू

वाटसरू मी भागुनी धर्मशाळेंत विसावें
येई जाग दचकून, नच प्रिया मजसवें !
हाय ! दूर गेली सखी, मात्र पडे कवडासा
जीर्ण कौलारामधून क्षीण उदास चांदाचा !

आतां कोठलीं मिळाया ! भटकतों वणवण,
परी आली वाटे मला शांतवाया परतून;
चांचपून आंथरूण पाहतों मी वेड्यापरी,
कवटाळीं पांघरूण, निराशेची धार उरीं !

' घुर्र घुर्र ' येतो नाद भिंतींवरी कोपऱ्यांत,
' घुर्र घुर्र ' पडसाद मिळे उलट तयांत
जरा फड्फड पंखांची, पुढें स्तब्ध होय सारें,
आणि अंतरीं माझिया क्षोभ गर्जे तीव्रस्वरें

' सखी ! सखी ! ' हांक देतों ओतुनीया जीव सारा,
स्तब्धताच पडसादे ' सखी ! सखी 'सें कठोरा !
तोंच विरला कवडासा, मिठाळिलें अंधाराला,
हतभागी जीव माझा पडे निराश धरेला !

धर्मशाळेंत उजाड वाटसरू मी एकला
कोण जाणे, झुंजूमुंजू केव्हां होणार पूर्वेला !

## " परीटाच्या टेंबीवर ! "

चैत्रपालवी पालवे, करवंदी उमलली,
सकाळींच सागरांत प्रभा सोनेरी हांसली;
झडे चौघडा खालतीं माता दुर्गेच्या यात्रेला,
" परीटाच्या टेंबीवरी " कळा पहिला लागला
तिच्या माझ्या ग प्रीतीला !

सनईचा आला सूर, तिच्या कानाशीं लागला
" चला यात्रेला ग बाई, चला मातेच्या जत्रेला !'
स्वच्छंदानें नाचावया बोलविते सृष्टी सारी
परी करांत गुंतुनी बिलगली माझ्या उरीं
परीटाच्या टेंबीवरी !

वाजे उरांत चौघडा, सनईचा येतो सूर,
जत्रा भरली प्रेमाची, जुवानीला ये बहर;
" प्रीतीसंगमीं आमुच्या वाजो चौघडा-सनई

" येऊं दोघेही मिळून," पडसाद ये हृदयीं
वायूवरी लीन होई

* * *

परी जेव्हां श्रावणांत पावसाची झडे सर,
घोर तुफान गर्जतें, काळजांत होतें चर्र !
ऐशा दिनीं वाजे सांजे माता दुर्गेचा चौघडा
परीटाच्या टेंबीवरी मीच एकटा उघडा
झाला प्रीतीचा चुथडा !

" झाली सांज, ये ग बाई" सनयीचे आले सूर,
' परीटाची टेंबी ' तरी भूतासारखी भेसूर !
वाळुडुंगीं परी धूर गांवशिवेच्या बाहेर,
" आलों मीही सये, बाई," आरडतां फाटे ऊर
परीटाच्या टेंबीवर !

## भादव्याची गौर

"...कोण बाई खिदळतें ? ओरडा हा काय तरी !
हं, हं, सारं समजलं ! मुली खेळवीती गौरी;
कोंकणींच्या कन्यांसवें भादव्याची गौर खेळे,
कुंपणांत गऊरीची वेल लाल-लाल फुले.

" झालीं वरसं कितीक मैतरीणी तई होत्या
सारी रात्र खेळवीत गौर नाचल्या-डोलल्या;
गेल्या सर्वजणी आतां, गेले दिवस तेव्हांचे
जरी पुन्हा बोलावीती हात फुलून गौरीचे ! !

" सारं विसरूनी गेल्या, भान नाहीं आनंदांत,
गाती खिदळती किती रंगूनीया फुगड्यांत;
खरं सांगूं...? वाटे हेवा नातवंडांचा आपुल्या
वेल गौरीची फूलतां, रंगीं रंगतां सानुल्या

" किती पाहिल्या कुंवारी खेळतांना आजवेरी !
किती ओवीले गजरे फुलतांच रान-गौरी !
पिढी नवीन येतसे, वेल नवी फुलतसे,
ऊर भरूनियां येतें, उमळतें तसतसें !

"...चला, झाली आतां सांज; कोंडापाऊस शिंपडे,
गौरी पोंचवाया गेल्या ओल्याचिंब दर्याकडे !
लावूं दे ग सांजवात, भूक लागे सोनुल्यांना,
रांधूं घास, खाऊं घालूं उन्हूनसा लेकरांना..."

## “आषाढाच्या काळ्या रात्रीं”

आषाढाच्या काळ्या रात्रीं ओरवणी गांवीं शिरे;
‘काळ’ पहिल्यांदा वाहे, आघोटीचें पाणी फिरे;
चढाओढ संगमाशीं तीन नद्यांच्या पाण्यांची,
निसर्गाच्या ऐशा खेळीं जलसमाध गांवाची
काय कथा बापुडीची !

घरधन्याच्या मागून होती काढीत दिवस,
उदरींच्या जिवासाठीं सोशी नरकींचा वास !
पण त्याचें काय तया जड सृष्टीला उन्मत्ता !
माळ्यासहित झोंपडी उमळून वाहवितां
बाळंतीण आंत माता !

गुरें-ढोरें, झाडें-माडें तीन दऱ्यांतुनी येती !
चाले कितीक जिवांची धडपड जिवासाठीं !
त्यांत झोंपडी गर्गरे, जळ तांबडें भिर्भिरे,

बाळ नेत्र ना उघडी, माय हृदयीं बावरे
'काळ'-प्रवाहीं हुरहुरे !

लागे मारूं हळू हांक जाग बाळा आणायास,
परी पड्घम मेघांचा टाकी गिळून शब्दांस !
नयनींच्या प्रेमोदकें पाही सावध कराया,
पण मुसळधारांनीं आंसू नेले वाहूनिया !
जीव ओतून दृष्टींत आणूं पाहे संजीवन,
तोंच बिजली चमूचमे टाकी डोळे दिपवून,
सृष्टि दावा घे साधून !

आणि सरतेशेवटीं घेई राजसा कुशींत,
बाळापरी पहूडते चिरनिद्रेंत प्रशांत !
तधी 'लोकमाता' 'काळ' पोटीं वाहून प्रेतांसी
धावे गधूळ प्रवाहीं भेटायास जलधीसी
काळ्या आषाढ रात्रीसी !

## “ जग म्हणे ‘ मारेकरी ’! ”

...आणि इतुक्या दिसांनीं झाली किती आनंदित,
क्षीण विझल्या दिवलीची जशी मोठी व्हावी वात;
कोमेजुनी फिक्कटले कसे फुरारती गाल,
मावळतां सूर्यबिंब जसें फुगीर नि लाल;

कधीं डुंगीं; केतकीच्या कधीं जाळींतुनी धीट;
गवताच्या ‘ कुऱ्यां ’-मागे; रुते ओल्याशा वाळूंत;
वाळुघरें किती छान आज तिनें बांधलीन;
सानपणीं बागडलों त्याची होई आठवण !

ऐशी भिरभिरे आज जरी झाली तिन्हीसांज,
नभीं चांदही ना तेवे, भानूसवें घेई नीज;
आणि उधान भरती तुडुंबली तीरावरी,
तरी तयांत नाचते, लहरींत ही लहरी !

*　　　*　　　*

दमूनिया अन् शेवटीं, " चल, " म्हणे, " खडपांत ",
" बसूं क्षणभर तेथ, करूं दोघें कानगोष्ट; "
खडकाच्यावरी लोंबे कडा ' सांडेच्या गण्याचा '
झिपटाया त्यास तुटे जीव सारखा लाटांचा;

होई अंधुक उजेड, दूर हुमण हुंकारे,
तैशी तीहि करी ' हूं, हूं, ' मग किंचित बावरे,
" इथून ना खालीं गेलीं गुरें झोंबीमधें हट्टी ? "
ऐसें बोलुनी वळवी उंच कड्यावर दृष्टी !
आणि कोसळली लाट कड्यावर मधोमधीं,
तोंच मिठाळली तीहि घट्ट-घट्ट मम हृदीं !

" माझ्या जिवाच्या सरदारा ! मीहि हट्टी गुरूं तैशी
" मीहि आहे लाट तैशी..." आणि सरली झट्दिशीं;
पातें डोळ्याचें ना लवे तोंच मिळे सागरासी,
आणि दुजी लाट पुन्हा मात्र भिडते कड्यासी !

एका भणंगाच्यासाठीं सोडी लाखांची सर्दारी,
त्याच भणंग सरदारा जग म्हणे मारेकरी !

# मूळपदीं !

तोच ! ओळखलें ? तोच ! दारीं परत मी आलों,
तीच याचीत याचना आजीं ‘ भणंग ’ पातलों !
किती उदार मनानें पूर्वीं तुवां गौरविलें,
किती सोज्ज्वळ स्नेहानें मज आपुला म्हटलें !
परी पिसाट मी तरी धिक्कारुनी गेलों तुला
धिक्कारुनी गेलों गर्वे जीवनींच्या चेतनेला !

यौवनाचा मद अंगीं, संपदेचा धूर डोळां,
सड तुटतां पतंग, वाटे, झालों मी मोकळा !
आणि आतां येथें पडे, येथें विजनवासांत,
जुन्या स्नेहाच्या धाग्याची आतां आठवण होत !

म्हणूनियां तूझ्या पदीं दीन जर्जर मी लीन,
देई, पूर्वीं देऊं केलें, मज प्रीतीचें तें दान !
तेलवात सखे करीं, आली विझत पणती,
उरलेल्या पंथीं तरी ये तूं, स्नेहले ! सांगातीं !

# हाकाहाक !

झरींतुनी झीरपतें थेंब थेंब गोड पाणी
सांठवीशी तें साक्षेपें घडीघडी खोळंबोनी !
आणि मीच बोलवितां गोड जीवन द्यावया
चहूदिशां गेलीस कां ? वेळ नाहीं बोलावया !

किती काळजीनें तुझें पाणी-शिंपणें चाललें !
सानुकल्या झाडांझुडां जीवविशी शीत जलें !
भाटांतील माडांनाही देसी पाणी थोडेंफार
परी मीच मागतां कां केलिस गे दया दूर !

गाढ धुकें वितुळतें सूर्यकरांनीं क्षणांत,
होतां बिजलीचा स्पर्श, जडभाव क्षणीं नष्ट,
देवतेच्या हस्तस्पर्शें विरताती पापराशी,
मग तूंच उदासीन मजवरी कां गे होशी !

आतां भटकभटकें जलधीच्या तीरावरी !
लागे निखार ओहटी, क्षीण जाहल्या लहरी !
माझें अरण्यरुदन कडेखडप घूमवी
आणि मग विरत ते सागराच्या धीर रवीं !

ये ग, ये ग, मत्स्यगंधे ! नाव इकडे वल्हव,
ने ग, ने ग, नागकन्ये ! दाव पाताळींचा ठाव !

## “ चिरकाल ना संगत ! ”

भटकतां रानींवनीं झरा निर्मळ मिळावा,
सुन्न जाहल्या भूवरी क्षण कवडासा पडावा,
हिमालयांत हिंडतां, बिंब उषेचें तरळ
जेंवी दिसावें, तेंवीच तव दर्शन प्रेमळ !

मज आवडसी किती ! असे “ प्रणय ” हा मनीं ?
मज किती प्रिय होसी ! नांव त्याचें “ स्नेह ” जनीं ?
वाटे कृतकृत्य झालों ! म्हणूं “ देवतानुग्रहें ” ?
किंवा आनंदी सरळ बालिकेच्या सुस्वभावें ?

निशागांभीर्य अनन्त तुझ्या मौनीं मला भासे,
उषासौंदर्य अनन्त तुझ्या हास्यांत विलसे,
बिजलीचा चमूचमाट तुझ्या नेत्रीं तरळतो,
तुझ्या ठायीं चैतन्याचा ऐसा साक्षात्कार होतो !

परी विरे सुख सारें, बुडत मी तमिस्रेंत
जधीं आठवतें मनीं : “ चिरकाल ना संगत ” !

## "आज तुझा जन्मदिन!"

सुभ्र श्यामल सांजेस, कुणा शांत सरोवरीं,
शून्य दृष्टीनें पाहतो कुणी विषण्ण संसारी!
आस-हर्ष नष्ट सारें! तोंच रुपेरी झर्कन
चमकावी मत्स्यकन्या, तशी स्फुरे आठवण :
"आज तुझा जन्मदिन!"

गायिका गे गोड कंठीं छेडी मधुर संगीत,
बुलबुल उपवनीं रम्य रवांत कूजत;
मग स्तब्ध होई गान, दूर विरतें कूजन
अवचित तें स्मरावें, तेंवी होई आठवण :
"आज तुझा जन्मदिन"!

अनंतशा अंतरालीं असंख्यसे ग्रहतारे,
नियमित संभाळती आपापली कक्षा सारे;
तेथ भेदुनिया क्षण, तुटाव्यात उल्का दोन,

तेंवी आपुली ओळख, होई त्याची आठवण :
"आज तुझा जन्मदिन !"

सखे ! सुनील अंबरीं जेंवी भरारे गरुड,
जाई दूरदूर; होई सूक्ष्म बिन्दूसा निगूढ !
तेंवी "वर्तमान" होई "भूतकाळां"त विलीन
तई तीव्र आणि सूक्ष्म एक जीवनीं स्मरण :
"आज तुझा जन्मदिन !"

# “ नको विसरूं गे ऐशी ! ”

दिसतांच तूं गे मार्गीं अंधुकशी दुरूनियां,
गूढ आशा तरळली मनीं–‘ येते कीं भेटाया ? ’
तुझी प्रेमळ सोज्ज्वळ मूर्ति हंसतमुख नी
पाहतांच मम मनीं संवेदना तरंगती !

फारा दिसांची कीं आस आज सफळ जाहली ?
विसरल्या अभाग्याला काय भेटाया पातली ?
परी साऱ्या आशांसारी आस विफल व्हावींना ?
सखे, कां गे विसरशी ? फिरविशी कीं लोचना !

भावनेच्या उबाऱ्यानें मनपांखरूं जगतें,
जधीं उदासीन जगीं जीवनच गारठतें;
आणि स्नेहाचा ओलावा तया धीर दे जगाया,
जईं दारुण दशेचा जाळी चटका हृदया !

तूंच ना, गे, फुलविली मनीं कोमल भावना ?
स्वप्नीं पाहिलेली मूर्ति भेटविली तुवां पुन्हा;
परि आतां साच वाटे तोहि भाव हीन तुला ?
नको विसरूं गे ऐशी दीनवाण्या या जीवाला ?

## “ कां गे ऐशी कठोरता ? ”

जीर्ण वाड्याच्या पुढून स्वारी जावी डौलामधें,
मनीं आशाळे बापुडा, जरा सुखावे आनंदें !
परी कोणी ढुंकूनही पाहत ना तयाकडे–
स्वारी थाटांत जातसे जशी आली तशी पुढें !

रेताडशा वाळवंटीं रम्य प्रदोषसमयीं !
आकाशींची पुण्यगंगा वाटे भुईवरी येई !
परी आभाळीं संचरे, दूरवर ती सारखी,
सुक्या रेताड-अंतरीं आस राही तशी सुकी !

जुनाट कीं आगरांत माड उभा उंच कोणी !
संध्याभ्रांची क्रीडा पाही तीरावर प्रतिदिनीं !
परी स्वैरसंचारी ती मेघमाळ ना शिंपडे–
जाई दूरदूर, परी पाहीनाच माडाकडे !

तैशी जाशी कां गे, सखे ? दूरदूर न बघतां ?
तुझ्या हळुवार हृदीं कां गे ऐशी कठोरता ?

## टीपा